मागणी क्र. वाय-२, २२१५- पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१) लेखाशीर्षांतर्गत १०-कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिपग्रा-१२२३/प्र.क्र.२१९/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: ०४ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः जिपआ-२०१६/प्र.क्र.३०१/पापु-२३, दिनांक २८.१२.२०२२
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दिनांक २७.०४.२०२२.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५
४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
५. शासनाचे पत्र क्रमांक जिपग्रा-१२२३/प्र.क्र.२८/पापु-२३ दिनांक २५.०७.२०२३
६. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. जिपग्रा-१२२३/प्र.क्र.२१९/पापु-२३, दिनांक ०९.०१.२०२४
७.शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०५.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदांमधील ग्रामीण पाणीपुरवठा विभागातील पदांचा सुधारीत आकृतीबंध दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला असून, जिल्हा परिषदांतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा विभागाचे मुख्यालय, यांत्रिकी उपविभाग, देखभाल दुरुस्ती कक्ष तसेच तालुकानिहाय उपविभाग यांच्यासाठी एकूण १७६० पदे बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. वित्त विभागाच्या दिनांक २७.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील निदेशानुसार, बाह्ययंत्रणेद्वारा घ्यावयाच्या कामाचे प्रदान "१०-कंत्राटी सेवा" या शीर्षाखाली दाखविणे आवश्यक आहे. महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ मधील तरतूदीनुसार, लेखाशीर्ष २२१५१८८१ अंतर्गत जिल्हा परिषदांच्या ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या वर्ग ३ व वर्ग ४ च्या कर्मचाऱ्यांना वेतन व वेतनेतर अनुदान उपलब्ध केले जाते. तथापि या लेखाशीर्षांतर्गत १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टांतर्गत पुरेसा निधी उपलब्ध नसल्यामुळे संदर्भाधीन (६) च्या शासन निर्णयान्वये २२१५ १८८१ या लेखाशीर्षांतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली उपलब्ध असलेला रु.१२०.०० लक्ष इतका निधी १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देण्यात आला आहे. आता १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली उपलब्ध असलेला निधी संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)" या लेखाशिर्षाखालील १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली रुपये ६२,५८,८१६ /-(अक्षरी रूपये बासष्ठ लाख अठ्ठावन्न हजार आठशे सोळा फक्त) इतका निधी मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांना पुढीलप्रमाणे प्रत्यक्षात भरलेल्या पदांकरिता वितरीत करण्यात येत आहे-

| अ.क्र. | तपशील | पदनाम | |
|---|---|---|---|
| | | डाटा एन्ट्री ऑपरेटर | चतुर्थ श्रेणी कर्मचारी |
| १ | संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाची मंजूर पदे | ११ | २३ |
| २ | यापूर्वी भरलेली पदे (संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र ५ मध्ये नमूद पदांपैकी सध्या कार्यरत पदे) | ० | १० |
| ३ | बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यासाठी अनुज्ञेय पदे (अ.क्र.१- अ.क्र.२) | ११ | १३ |
| ४ | परभणी जिल्हा परिषदेने प्रत्यक्षात भरलेली पदे | ९ | १३ |

२. उपरोक्त निधी पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे -

(अ) जिल्हा परिषदेने सदर निधीचा विनियोग संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाच्या मंजूर अनुज्ञेय (संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन

निर्णयासोबतच्या विवरणपत्र ५ मध्ये नमूद पदांपैकी सध्या कार्यरत पदे वगळून) पदांवर भरलेल्या मनुष्यबळाच्या मानधनाकरिताच करावा. अन्य प्रयोजनार्थ या निधीचा विनियोग करण्यात येऊ नये. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

(ब) वित्त विभाग शासन निर्णय दिनांक २७.०४.२०२२ व शासनाने वेळोवेळी शासन निर्णय/परिपत्रकांद्वारे निर्गमित केलेल्या सूचनांनुसार बाह्ययंत्रणेची पदे भरण्याची दक्षता घ्यावी.

३. पुनर्वितरणाने उपलब्ध करुन दिलेला निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर करावा. संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मंजूर आकृतीबंधामध्ये नमूद केलेल्या बाह्ययंत्रणेच्या पदाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही पदांचा खर्च या निधीतून करु नये. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७०/ व्यय-३, दिनांक ०२.०२.२०२४ अन्वये प्राप्त अभिप्रायांनुसार तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन (४) व (७) शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात व बीम्सप्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०४१०४९३८७४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2024.03.04 11:26:14 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विधानसभा सदस्य/ विधान परिषद सदस्य, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी
४. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी

५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१३. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)
१४. कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग
१५. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१६. निवड नस्ती कार्यासन पापु-२३